आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात संघ लोकसेवा/ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या स्पर्धा परिक्षांच्या तयारी करीता प्रशिक्षण देण्याच्या योजनेकरीता निधी वितरण. (लेखाशीर्ष २२२५ डी ३८७)

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र.०२/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २३ नोव्हेंबर, २०२१.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८ / अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. प्रशिक्षण-२०१२/ प्र.क्र.१५८ (भाग-२)/का-१७, दि.१५.०७.२०१४.
३) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे अ.शा.पत्र क्र.२०२१/का-२/२६, दि.१२.१०.२०२१.
४) आदिवासी विकास विभाग,नस्ती क्र.प्रशिक्षण-२०२१/ प्र.क्र.११८/का-०९.

**प्रस्तावना:-**

राज्यातील अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचे स्पर्धा परिक्षांमध्ये भाग घेण्याचे प्रमाण अल्प आहे. त्यामुळे या उमेदवारांना विकासाच्या मुख्य प्रवाहात आणण्याच्या अनुषंगाने संघ लोकसेवा आयोग (UPSC)/ महाराष्ट्र लोकसेवा आयोग (MPSC) मार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या स्पर्धा परिक्षा उत्तीर्ण होऊन प्रशासकीय अधिकारी होण्याची संधी मिळावी या उद्देशाने संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयास अनुसरून आदिवासी विकास विभागामार्फत विविध स्पर्धा परिक्षांकरीता प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येत आहेत. या नुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सदर कार्यक्रम राबविण्याकरीता निधी उपलब्ध करून देण्याबाबत आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्ताव प्राप्त झाला आहे. या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.४ येथील नस्तीवर वित्त विभागाने निधी वितरणास मान्यता दिलेल्या मर्यादेतील निधी नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य शीर्षाखालील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना भारतीय व राज्य प्रशासकीय सेवेची संधी प्राप्त करून देण्यासाठी त्यांना संघ लोकसेवा आयोग/ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेण्यात येणाऱ्या स्पर्धा परिक्षांचे प्रशिक्षण देणे या योजनेंतर्गत वित्त विभागाच्या सहमतीने ५० टक्के मर्यादेतील खालीलप्रमाणे निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नांव व लेखाशीर्ष | बाब क्रमांक | सन २०२१-२२ करीता अर्थसंकल्पित तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | (०२) (३६) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना भारतीय व राज्य प्रशासकीय सेवेची संधी प्राप्त करून देण्यासाठी त्यांना संघ लोकसेवा आयोग/ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेण्यात येणाऱ्या स्पर्धा परिक्षांचे प्रशिक्षण देणे (२२२५ डी ३८७), | ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | १०००.०० | ५००.०० |

२. वरीलप्रमाणे रू. ५००.०० लाख (रू. पाच कोटी फक्त ) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणुन आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे.

३. नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतूद त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित करावी. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व अनौ.सं.क्र.९३५/ व्यय-१४, दि.२८.१०.२०२१ अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११०२१७४०२०४०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2021.11.23 14:23:39 +05'30'

**(किरण कि.पवार)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास (सर्व)/ प्रकल्प अधिकारी ,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व).
६. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
७. उपसचिव / कक्ष अधिकारी (का-९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती (का-६).